सन २०१२-१३ मध्ये भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत ता.किनवट, जि. नांदेड येथील रस्त्याच्या कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत .

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः केंद्रिय-२०१४/प्र.क्र.८४/का-१९
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: १८ /०२/२०१५

वाचा-

१) **शासन निर्णय क्रमांकः केंद्रिय-२०१२/प्र.क्र.५२/भाग-२/का-१९ दि. ०३/०६/२०१३**

**प्रस्तावना -**

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत सन २०१२-१३ साठी रस्ते व पूलांच्या बांधकामासाठी केंद्र शासनाने रु. ७७७.१० लक्ष इतका उपलब्ध केलेल्या खर्चासाठी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना सुपुर्द केलेल्या निधीतून करावयाची कामे वाचा येथील शासन निर्णयान्वये निश्चीत करण्यात आली आहेत. यातील रु. २८.५० लक्ष किंमतीच्या ता.किनवट, जि. नांदेड येथील रस्त्यांच्या कामांच्या आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी सादर केलेल्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

प्रस्तुत निर्णयाद्वारे खालील रस्त्यांच्या बांधकामाच्या खर्चाच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | शासन निर्णय दिनांक ०३/०६/२०१३ मधील अ.क्र. | कामाचा तपशील | कामाचा अंदाजित खर्च (रु लक्ष) |
|---|---|---|---|
| १ | २ (i) | Construction of Jawral Approach road Tal kinawat Dist Nanded | १४.२५ |
| २ | २ (ii) | Construction of Wadasa Approach road Tal kinawat Dist Nanded | १४.२५ |
| | एकुण | | २८.५० |

२. वरील बांधकामाचे बाबतीत सन २०१४-१५ साठी दरसूचीमध्ये झालेल्या वाढीपोटी १५% व आकस्मित खर्चासाठी बांधकाम किंमतीच्या ४% प्रमाणे तरतूद करण्यात यावी. मात्र खर्च मंजूर निधीच्या मर्यादेतच करावा. या कामांची निविदा प्रक्रीया प्रचलित

कार्यपध्दती/नियमांचे पालन करुन करावी. तसेच बांधकामासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक साध्य अहवाल शासनास विहित प्रपत्रात सादर करावे. तसेच रस्त्यांचे काम पूर्ण झाल्यानंतर भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५ (१) अंतर्गम काम पूर्ण केल्याबाबतचा फलक कामाच्या ठिकाणी दर्शनिय भागी लावावा. सदर कामासाठी येणारा खर्च लेखाशिर्ष २२२५, अनुसूचीत जाती, अनुसूचीत जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण व उपशिर्ष २२२५ २४२४ अंतर्गत उपलब्ध असलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ ,भाग पहिला ,उपविभाग -तीन ,परिच्छेद (२)२७ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२३१४२७५७६७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manojkumar Gorakh Mahale

Digitally signed by Manojkumar Gorakh Mahale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manojkumar Gorakh Mahale
Date: 2015.02.23 14:37:28 +05'30'

**मनोजकुमार महाले**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. मा.मंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई
२. मा.राज्यमंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. स्वीय सहायक,मा.प्रधान सचिव,आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई
४. सार्वजनिक बांधकाम विभाग / नियोजन विभाग / वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
५. आयुक्त,आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,नाशिक
६. उपसचिव,आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई
७. संगणक समन्वयक,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
८. निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई